**अल्पसंख्यांक विकास विभागाच्या विविध योजनांच्या अंमलबजावणीची कार्यवाही करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१०/प्र.क्र.३४/ई-१
महसूल व वन विभाग,
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांक :- ९.९.२०१०.

**<u>परिपत्रक:-</u>**

शासनाने दि. २१.१.२००८ रोजीच्या अधिसूचनेन्वये अल्पसंख्याक विकास विभाग स्वतंत्रपणे निर्माण केलेला आहे. सदर अधिसूचनेनुसार सामान्य प्रशासन विभाग, महसूल व वन विभाग, रोजगार व स्वंयरोजगार विभाग आणि पर्यटन व सांस्कृतीक विभागाकडील अल्पसंख्यांक विकासासंबंधित विषय या नवीन विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आलेले आहेत. महसूल व वन विभागातील " वक्फ " हा विषय या विभागाकडे हस्तांतरीत झालेला आहे. परंतु अल्पसंख्यासक विकास विभागाच्या या योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी क्षेत्रीय स्तरावर कोणतेही कार्यलय नव्याने निर्माण करण्यात आलेले नाही. अल्पसंख्याक विकास विभागाच्या या योजनांच्या अंमलबजावणीसाठी महसूल विभागाच्या नियंत्रणाखाली असलेल्या विभागीय आयुक्तांच्या व जिल्हाधिकारी कार्यालयाच्या उपजिल्हाधिकारी दर्जाच्या अधिकाऱ्याकडे काम सोपविण्याबाबत मा. मुख्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली दि.९.१२.२००९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मा. मुख्यमंत्री महोदयांनी आदेश दिलेले आहेत.

२. वरील बाबींचा विचार करता, अल्पसंख्याक विकास विभागाच्या योजना क्षेत्रीय स्तरावर प्रभावीपणे राबविण्यासाठी महसूल व वन विभागाच्या नियंत्रणाखालील विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी कार्यालयातील एका उपजिल्हाधिकारी दर्जाच्या अधिकाऱ्याकडे अल्पसंख्यांक विभागाचे काम सोपविण्याबाबत खालील कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

१) जिल्हास्तरावर अल्पसंख्याक विकास अधिकारी म्हणून काम पाहण्यासाठी जिल्हाधिकाऱ्यांनी निवासी उपजिल्हाधिकारी किंवा इतर सक्षम अधिकाऱ्याकडे काम सोपवावे.

२) विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी त्यांचेकडील मासिक बैठकांमध्ये अल्पसंख्याक विभाक विभागाच्या योजनांचा आढावा घ्यावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००९०९१९११५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**( मिलिंद कुळकर्णी )**
कार्यासन अधिकारी,
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१) प्रधान सचिव , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२

२) सर्व विभागीय आयुक्त,

३) सर्व जिल्हाधिकारी,

४) निवडनस्ती, ई- १ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.